# सम्राट आणि बुलबुल

हॅन्स ख्रिश्चियन अँडरसन



ही गोष्ट चीनमध्ये घडली, चीनच्या सम्राटाचा नवीन राजवाडा बांधून पूर्ण झाल्यावर लगेच!

राजवाड्याबद्दल कुतूहल वाटून दूरदूरचे पर्यटक तो पाहायला आले. त्यांनी राजवाड्याच्या सौंदर्याचे गुणगान गायले, त्यावर पुस्तके लिहिली.



सम्राटाने ही पुस्तके वाचली. त्यातील एक वाक्य वाचून त्याला नवल वाटले: “या राजवाड्यात सुंदर-सुंदर गोष्टी आहेत. पण बुलबुलचे गाणे ही सर्वात सुंदर गोष्ट आहे.”

राजवाड्यात गाणारा पक्षी आहे, याचा सम्राटाला पत्ताच नव्हता. त्याने लगेच आपल्या प्रधानाला बोलावून घेतले.





“मला त्या बुलबुलचं गाणं ऐकायचंय,” सम्राटाने प्रधानाला आज्ञा केली.

प्रधानाने बुलबुलला शोधण्यासाठी सैनिक पाठवले. पण त्यांना काही बुलबुल मिळाला नाही. शेवटी स्वयंपाकघरातील एक दासीने हे कोडे सोडवले.

“रोज संध्याकाळी बुलबुल माझ्यासाठी गातो,” दासी म्हणाली.



दासी दरबारातील लोकांना जंगलात घेऊन गेली. तिथे तिने एक करड्या रंगाचा पक्षी दाखवला. तो पक्षी तसा सुंदर नव्हता, पण त्याचे गाणे अतिशय सुंदर होते. असे गाणे त्यांनी यापूर्वी कधी ऐकले नव्हते.



त्या सायंकाळी बुलबुल सम्राटासाठी गायला.

बुलबुलचे सुंदर आणि हृदयद्रावक गाणे ऐकून सम्राटाच्या डोळ्यांतून अश्रू ओघळू लागले. त्याने बुलबुलला एक सोनेरी पिंजरा बक्षीस दिला आणि बुलबुलच्या सुरक्षेसाठी बारा पहारेकऱ्यांची नेमणूक केली.



बुलबुलला दररोज दोनवेळा राजवाड्याबाहेर जाण्याची परवानगी देण्यात आली.

एके दिवशी कुणीतरी सम्राटाला एक नवीन खेळणे भेट दिले. हे खेळणे म्हणजे एक यांत्रिक बुलबुल होते. ते हुबेहूब खऱ्या बुलबुलसारखेच अतिशय सुंदर गात असे. शिवाय खेळणे दिसायलाही आकर्षक होते.





कधीकधी दोन्ही बुलबुल एकत्रच गात असत. पण ते फारसे श्रवणीय वाटत नसे. खरा बुलबुल त्याच्या मनाला भावेल ते गात असे, तर खेळण्यातला बुलबुल फक्त त्याच्या यंत्रात साठवलेले तेच तेच सूर आळवत असे.

एके दुपारी पिंजरा खुला असताना खरा बुलबुल सर्वांची नजर चुकवून बाहेर उडून गेला.



सम्राटाला वाईट वाटले नाही.

आता तो खेळण्यातील बुलबुलचे गाणे ऐकू लागला.

पण एके दिवशी खेळण्यातील बुलबुलने गाणे गायचे नाकारले.



दरबारी घड्याळजीने खेळण्यातील बुलबुलची तपासणी केली. “हे खेळणं खराब झालंय. आता काही खास प्रसंगांच्या वेळीच याचं गाणं ऐका,” तो म्हणाला.



अनेक वर्षे निघून गेली. खेळण्यातील बुलबुल अधिकाधिक खराब होत गेला. एके दिवशी तो गायचा पूर्णपणे बंद झाला.

तोपर्यंत सम्राट वृद्ध झाला होता. तो खूप आजारी पडला होता.



सम्राटाने आपल्या वेदनांना आराम मिळावा यासाठी खेळण्यातील बुलबुलला गाण्याची आर्जवे केली. पण त्याचा काही उपयोग झाला नाही.

अचानक त्याने खिडकीबाहेर एक सुंदर आवाज ऐकला. बाहेर खरा बुलबुल या सुंदर जीवनाचे, त्यातील आनंदी क्षणांचे गाणे गात होता.

खऱ्या बुलबुलचे गाणे ऐकून सम्राटाच्या वेदना काहीशा कमी झाल्या.

“मी तुझे उपकार कसे फेडू?” सम्राटाने विचारले.

“माझं गाणं पहिल्यांदा ऐकून आपल्या चेहऱ्यावर अश्रू ओघळले, तेव्हाच आपण मला उपकृत केलंत,” बुलबुल म्हणाला.

बुलबुल पुन्हा गायला आणि म्हणाला, “मी सोन्याच्या पिंजऱ्यात राहाण्यासाठी नाही जन्मलोय. आता आपण शांतपणे झोपी जावं. आपण जागे झाल्यावर मी पुन्हा आपल्यासाठी गाईन. आपल्या राज्यात कायकाय चाललंय ते माझ्या गाण्यातून ऐकवीन. दूर राहून गाणारा पक्षी सम्राटाच्या नजरेला न पडणाऱ्या गोष्टी सहज पाहू शकतो. पण हे रहस्य फक्त आपल्या दोघांमध्येच राहील.”

सम्राटाने बुलबुलचे आभार मानले आणि तो गाढ झोपेच्या स्वाधीन झाला.

अशाप्रकारे महान सम्राट आणि बुलबुल पक्ष्यामध्ये एका रहस्यमय मैत्रीची सुरुवात झाली.



अंत